**वसंतराव नाईक तांडा/वस्ती सुधार योजनेंतर्गत सन २०१९-२० करीता अहमदनगर जिल्ह्यातील कामांना प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागाव बहुजन कल्याण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांकः तांसुयो-२०१९/प्र.क्र.३८/विजाभज-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-३२.
दिनांक : १७ मार्च, २०२०.

संदर्भ - १) सामाजिक न्याय,सांस्कृतीक कार्य व क्रिडा व पर्यटन विभाग, शासन निर्णय क्रमांकः- इमाव-२००३/ प्र.क्र. २०५ /मावक-३, दि ०७ जून, २००३.
२) विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागाव वर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण विभाग शासन निर्णय क्रमांक तांसुयो-२०१७/प्र.क्र.८४/विजाभज-१, दि.३० जानेवारी, २०१८.
३) विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागाव वर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण विभाग शासन परिपत्रक क्रमांक तांसुयो-२०१७/प्र.क्र.८४/विजाभज-१, दि.११ फेब्रुवारी, २०१९.
४) विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागाव वर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण विभाग शासन परिपत्रक क्र.अर्थस-२०१९/प्र.क्र.१७०/अर्थसंकल्प, दि.०४ एप्रिल,२०१९.
५) विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागाव वर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण विभाग शासन निर्णय क्रमांक तांसुयो-२०१७/प्र.क्र.८४/विजाभज-१, दि.२४ जुलै,२०१९.
६) सहायक आयुक्त, समाजकल्याण, अहमदनगर यांचे क्र.सआ/सक/अन/तांडा/ २०१९-२०/४७०, दिनांक १७/२/२०२० रोजीचे पत्र.
७) जिल्हाधिकारी अहमदनगर यांच्या अध्यक्षतेखालील समितीचे इतिवृत्त दि.१२.०२.२०२०

**प्रस्तावना** -

महाराष्ट्र राज्यात भटक्या जमातीच्या अनेक जाती, जमाती अजूनही भटकंती करुन स्थलांतरीत स्वरुपाचे जीवन जगतात. लमाण, बंजारा, धनगर, पारधी अशा अनेक समूहांचे तांडे/ वस्त्या असून अशा तांड्यामध्ये या जाती / जमातीचे लोक अनेक वर्षापासून राहत असले तरी अशा तांडे किंवा वस्त्यांना प्राथमिक सुविधा उपलब्ध होत नाहीत व त्यामध्ये आधुनिकतेकडे कल असला तरी बहुसंख्य समाज गरीबीचे जीवन जगत आहे. त्यासाठी तांडे, वाडी किंवा वस्त्या यामध्ये या समाजास स्थिर जीवन जगता यावे याकरिता सुविधा उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. अनुसूचित जातीच्या वसाहतीत "दलित वस्ती सुधारणा योजना" सन १९७२ पासून राबविण्यात येत असून त्याच धर्तीवर राज्यातील भटक्या समाजाच्या सुधारणेसाठी वसंतराव नाईक तांडा / वस्ती सुधार योजना शासनाने सन २००३-०४ या वित्तीय वर्षापासून सुरु केली आहे. सदर योजनेच्या अंमलबजावणीसाठी वाचा येथील क्र.२ च्या शासन निर्णयान्वये सविस्तर सूचना निर्गमित केलेल्या आहेत.

सदर योजनेतील कामांसाठी सन २०१९-२० या आर्थिक वर्षात अहमदनगर जिल्ह्यातील वसंतराव नाईक तांडा/वस्ती सुधार योजनेतून हाती घ्यावयाच्या कामांना प्रशासकीय मान्यता देण्याबाबत जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष, वसंतराव नाईक तांडा/ वस्ती सुधार योजनेची जिल्हास्तरीय समिती, अहमदनगर यांच्या दिनांक १२/०२/२०२० रोजीच्या बैठकीत मान्यता दिलेल्या कामांच्या प्रस्तावास खालीलप्रमाणे मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** -

अहमदनगर जिल्ह्यातील विमुक्त जाती, भटक्या जमातीच्या तांडा/वस्ती यांच्या सुधारणेसाठी जिल्हास्तरीय समितीने मान्यता दिलेल्या रुपये ७५.९७७८६ लक्ष (अक्षरी रूपये पंच्याहत्तर लाख सत्याण्णव हजार सातशे शहाऐंशी फक्त) इतक्या रक्कमेच्या १२ कामांना (सोबत जोडण्यात आलेल्या परिशिष्ट-अ मधील नमूद) प्रशासकीय मान्यता देण्यात येत असून सदर कामांकरीता सन २०१९-२० मध्ये उपलब्ध तरतुदीमधून निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य क्रीडा व विशेष सहाय्य विभाग क्र. इमाव-२००३/ प्र.क्र. २०५/मावक-३, दिनांक ७ जून, २००३ मध्ये नमूद केलेल्या तसेच शासनाने यासंबंधी वेळोवेळी दिलेले आदेश / परिपत्रकाप्रमाणे निधी खर्च करण्यात यावा.

३. याद्वारे मंजूरी देण्यात आलेली व हाती घेण्यात येणारी परिशिष्ट-अ मध्ये नमूद कामे ही शासनाच्या किंवा स्थानिक स्वराज्य संस्थांच्या किंवा आमदार/खासदार किंवा अन्य कोणत्याही योजनेतून यापूर्वी मंजूर झाली नाहीत किंवा करण्यात आली नाहीत याची खात्री करुन हाती घेण्यात यावी.

४. सोबत जोडलेल्या यादीतील (परिशिष्ट-अ) कामांचे सविस्तर अंदाजपत्रक तयार करुन त्याला सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता घेण्यात यावी.

५. सदर कामांकरिता उपलब्ध करुन दिलेला निधी त्याच उद्दिष्टासाठी खर्च करण्यात येत असल्याचे व काम गुणवत्तेनुसार झाले आहे किंवा कसे, तसेच मंजूर कामावरच मंजूर निधी खर्च झाला आहे किंवा कसे हे संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांनी पहावे.

६. याद्वारे मंजूर कामांवर निधी खर्च करताना तो विहित कार्यपध्दती अनुसरुन सर्व वित्तीय कायदे व नियमांचे तसेच विहित प्रक्रियेचे अवलंबन करण्यात यावे. निधी खर्च करण्याबाबत वित्त विभागाकडून वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेल्या शासन निर्णयातील सूचनांचा व वित्तीय अधिकाराच्या मर्यादेचा भंग होणार नाही तसेच कुठल्याही शासन निर्णय / अधिकारांचा भंग होणार नाही हे संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांनी पहावे.

७. संबंधीत सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण विभाग व समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद यांचे या कामावर प्रत्यक्ष नियंत्रण राहील व ते या कामाच्या प्रगतीचा अहवाल संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांना व शासनास सादर करतील.

८. यावरील खर्च "मागणी क्र.झेडजी-३, २२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, ८०-सर्वसाधारण, १०२-स्वयंसेवी संस्थांना मदत, (०२) तांडा वस्ती सुधार योजना,(०२)(०१) विजाभज आणि विमाप्र यांच्यासाठी तांडा वस्ती सुधार योजना (कार्यक्रम), ३१-सहाय्यक अनुदान (वेतनेतर) (कार्यक्रम) (दत्तमत) (२२२५ एफ ०५८)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो या योजनेअंतर्गत प्राप्त अनुदानातून भागविण्यात यावा.

९. सदरचा निधी वितरीत करण्यासाठी सह सचिव, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग, मंत्रालय मुंबई यांना “नियंत्रक अधिकारी” म्हणून तसेच सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण अहमदनगर यांना “आहरण व संवितरण अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे. आहरण व संवितरण अधिकारी यांनी कामाबाबतचा अहवाल वेळोवेळी शासनास सादर करावा व याबाबत महालेखापाल कार्यालयाशी ताळमेळ करुन त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

१०. सदरहू शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२००३१७१८०९५३४०२२ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Bhaurao Raghunath Gavit

Digitally signed by Bhaurao Raghunath Gavit
DN: CN = Bhaurao Raghunath Gavit, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = VJNT OBCS SBC Welfare Dept.
Date: 2020.03.19 15:08:06 +05'30'

**(भा.र.गावित)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल महाराष्ट्र -१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर.
२. जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष, वसंतराव नाईक तांडा/वस्ती सुधार योजना जिल्हास्तरीय समिती, अहमदनगर.
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अहमदनगर.
४. संचालक, इमाव, बहुजन कल्याण संचालनालय, पुणे
५. प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण, नाशिक विभाग, नाशिक
६. सहायक आयुक्त, समाज कल्याण, अहमदनगर.
७. जिल्हा समाजकल्याण अधिकारी, अहमदनगर.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर.
९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१०. लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई
११. सह सचिव (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. उप सचिव (का-१४११) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. उप सचिव (व्यय-१५) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. सर्व उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय
१५. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), इमाव, बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय.
१६. स्वीय सहायक, मा. मंत्री, इतर मागास बहुजन कल्याण विभाग.
१७. स्वीय सहायक, मा. प्रधान सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय.
१८. निवड नस्ती, विजाभज-१.

**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: तांसुयो-२०२०/प्र.क्र.३८/विजाभज-१**
**दिनांक- १७ मार्च, २०२०**
**परिशिष्ट-अ**

**वसंतराव नाईक तांडा/वस्ती सुधार योजनेंतर्गत सन २०१९-२० मध्ये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या अहमदनगर जिल्ह्यातील कामांची यादी**

| अ. क्र. | तालुका | ग्रामपंचायत | तांडा/वस्तीचे नाव | तांडा वस्तीची लोकसंख्या | कामाचे स्वरूप | कामाची किंमत (रुपये लक्ष) |
|---|---|---|---|---|---|---|
| १. | संगमनेर | जोर्वे | पांढरी वस्ती | ५६ | पांढरी वस्ती येथे स्ट्रीट लाईट बसविणे | ४.०० |
| २. | संगमनेर | पारेगांव खुर्द | धनगर व्हडगर वस्ती | ७० | धनगर व्हडगर वस्तीमध्ये पाईपलाईन विस्तारीकरण | ३.९९५ |
| ३. | संगमनेर | वेल्हाळे | हरिबाबानगर | १२५ | हरिबाबानगर येथे पाणी पुरवठा पाईपलाईन करणे | ४.९८९ |
| ४. | संगमनेर | रणखांब | धनगर-खेमनरवस्ती | १४५ | खेमनर वस्तीमध्ये पाणीपुरवठा पाईपलाईन करणे | ५.९९३८६ |
| ५. | संगमनेर | कासारे | धनगर वस्ती | २५९ | धनगर वस्तीमध्ये रस्ता काँक्रीटीकरण करणे | १०.०० |
| ६. | संगमनेर | कासारे | वंजारीवस्ती | २०३ | वंजारीवस्तीरस्ता काँक्रीटीकरण करणे | १०.०० |
| ७. | संगमनेर | जांभुळवाडी | पकळेवस्ती | ७५ | पकळेवस्ती पोहच रस्ता काँक्रीटीकरण करणे | ४.०० |
| ८. | संगमनेर | जांभुळवाडी | खेमनरवस्ती | ५० | खेमनरवस्तीरस्ता काँक्रीटीकरण करणे | ४.०० |
| ९. | संगमनेर | जांभुळवाडी | धनगर-हिरेवाडी | ३०० | हिरेवाडी रस्ता काँक्रीटीकरण करणे | १०.०० |
| १०. | संगमनेर | धांदरफळ बु | रामोशी विठ्ठल मंदिर | ८९ | रस्ता काँक्रीटीकरण | ४.०० |
| ११. | संगमनेर | पिंपरणे | धनगर राहिंजवस्ती | ४९० | धनगर राहिंजवस्ती रस्ता खडीकरण करणे | ५.०० |
| १२. | संगमनेर | मिरपूर | वंजारीवस्ती गांवठाण | २८५ | वंजारीवस्ती गांवठाण येथे रस्ती काँक्रीटीकरण करणे | १०.०० |
| | | | | | एकूण | ७५.९७७८६ |

Bhaurao Raghunath Gavit

Digitally signed by Bhaurao Raghunath Gavit
DN: CN = Bhaurao Raghunath Gavit, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = VJNT OBCS SBC Welfare Dept.
Date: 2020.03.19 15:08:21 +05'30'

**(भा. र. गावित)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**